**कवलापूर, जि. सांगली येथील विमानतळ धावपट्टी बंद करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय, क्रमांक : एव्हीएन २००९/प्र. क्र. ५८७/०९/२८-अ,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २६ ऑक्टोबर,२००९.

**वाचा : १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक :एव्हीएन १०९६/ प्र.क्र. १२०/९६/२८-अ, दि. १३ मार्च, १९९७ आणि दि. १० फेब्रु. १९९८**
**२) उप मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. मऔविम/मूभूपुअ/४९४, दिनांक १७ एप्रिल, २००९**

**प्रास्ताविक :**

संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक १० फेब्रुवारी, १९९८ अन्वये कवलापूर, जि. सांगली येथील विमानतळ धावपट्टी विकास, व्यवस्थापन व परिरक्षणासाठी महसूल व वन विभागाच्या दि. १ जाने, १९९३ च्या परिपत्रकातील परिच्छेद क्र २ मधील तरतूदींच्या अधीन राहून उद्योग, उर्जा व कामगार विभागामार्फत महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडे हस्तातरीत करण्यासाठी मान्यता दिली आहे. त्यानुसार सदर विमानतळ धावपट्टी अंतर्गत राखीव सरकारी क्षेत्र एकूण ६६.५६ हेक्टरचा महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळास दिनांक २३ जानेवारी, २००१ रोजी ताबा मिळाला आहे. तथापि, सदर विमानतळ / धावपट्टीसाठी आवश्यक क्षेत्र मुळात कमी आहे, धावपट्टीच्या मध्यापासून २५०० मी. त्रिज्येतील बांधकामे विमान धावपट्टीसाठी अडथळा ठरु शकतात, तसेच विमानतळ धावपट्टीच्या विसतारासाठी खाजगी जमीन संपादनासाठी संबंधित खतेदारांनी विरोध केला असून, त्याबाबतचे प्रकरण न्यायप्रविष्ठ आहे.

उपरोक्त परिस्थितीत, कवलापूर, जि. सांगली विमानतळ धावपट्टीचा विस्तार / विकास करणे शक्य नसल्यामुळे सदर विमानतळ धावपट्टी बंद करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

२. कवलापूर, जि. सांगली येथील विमानतळ त्याच्या विकास / विस्तारासाठी येत असलेल्या अडचणी विचारात घेऊन बंद करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. सदर विमानतळ धावपट्टी अंतर्गत शासकीय एकूण ६६.५६ हेक्टर जमीन व्यवस्थापन आणि देखभालीसाठी महाराष्ट्र औद्योगिक

विकास महामंडळाच्या अखत्यारित राहील. महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने सदर जमीन अतिक्रमणमुक्त ठेवणेबाबत व्यवस्था करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in वर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २००९१०१४८४०४७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

सही/-

( अं. वि. अंभिरे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) सर्व सचिव / प्रधान सचिव / अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
६) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे,
७) जिल्हाधिकारी, सांगली,
८) उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित, मुंबई,
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई,
१०) संचालक (विमानचालन), विमानचालन संचालनालय, जुहू, मुंबई,
११) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई / नागपूर
१२) उप सचिव (ज-५), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) उप सचिव (उदयोग), उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४) उप सचिव (विमानचालन), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.